**न्या.गायकवाड समितीने सादर केलेल्या चौकशी अहवालामध्ये उल्लेखित खाजगी पुरवठादार व संस्था यांना आदिवासी विकास विभागाकरिता वस्तू व सेवा पुरवण्याबाबत काळ्या यादीतून वगळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.कायादी-२०२२/प्र.क्र.२/का-७**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २६ मे, २०२५

**संदर्भ:-** शासन आदेश क्र.गाअका-२०१७/प्र.क्र.१५६/२०१७/का.७ दि.२२/०१/२०२०.

**प्रस्तावना:-**

सन २००४-२००५ ते सन २००८-२००९ या कालावधीत आदिवासी विकास विभागामार्फत राज्यातील आदिवासींकरीता राबविण्यात आलेल्या विविध कल्याणकारी योजनांच्या अंमलबजावणीमध्ये झालेल्या अनियमिततेच्या अनुषंगाने, श्री.बहिरम पोपटराव मोतीराम व श्री. गुलाब तानाजी पवार यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.१५३/२०१२ दाखल केली. सदर जनहित याचिकेमध्ये नमूद तक्रारींच्या अनुषंगाने, शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग दिनांक १५.०४.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मा.श्री.एम.जी. गायकवाड, (सेवानिवृत्त न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई) यांच्या अध्यक्षतेखाली पाच सदस्यीय चौकशी समिती गठित केली.

२. मा.गायकवाड समितीने चौकशी करून, चौकशी अहवाल दिनांक ३०.०१.२०१७ रोजी शासनास आणि दिनांक ३१.०१.२०१७ रोजी मा. उच्च न्यायालयास सादर केला. न्या. गायकवाड समितीने सादर केलेल्या शिफारशीनुसार एकूण १०५ खाजगी पुरवठादार/संस्थांनी, आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या अंमलबजावणीमध्ये गैरवापर केल्याचे नमूद केले आहे. त्यानुसार मा.उच्च न्यायालयाने न्या.गायकवाड समितीने सादर केलेल्या चौकशी अहवालामध्ये उल्लेखित खाजगी पुरवठादार व संस्था यांना आदिवासी विकास विभागाकरीता वस्तु व सेवा पुरविण्याबाबत काळ्या यादीत टाकण्यासंदर्भात शासनाने त्वरीत कार्यवाही करावी असे निर्देश दिले होते.

सबब, शासनाने संदर्भाधीन आदेशाद्वारे एकूण १०५ खाजगी पुरवठादार/संस्थांना यापुढे आदिवासी विकास विभागामार्फत आणि विभागांतर्गत येणाऱ्या सर्व क्षेत्रिय कार्यालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांकरीता शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग आयआयआय/उद्योग- ४. दिनांक ०१.१२.२०१६ च्या ५.२ (अ) नुसार बंदी घालण्यात येत असून, त्यांना काळ्या यादीत टाकण्यात आले आहे.

**३.** प्रस्तूत प्रकरणी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी सर्व अपर आयुक्त कार्यालये आणि आदिवासी विकास महामंडळ, नाशिक येथे प्रत्यक्ष भेट देवून कागदपत्रांची पडताळणी करुन व प्रकल्प कार्यालय व अपर आयुक्त कार्यालय यांचे अभिप्राय विचारात घेवून काळ्या यादीत समाविष्ट केलेल्या १०५ संस्थाबाबतचा अहवाल शासनास सादर केला आहे. आयुक्त कार्यालयाने तपासणीअंती ज्या संस्थाबाबत योजनेची अंमलबजावणी योग्यरित्या केल्याचे दिसून आले, वसूली निरंक आहे, FIR बाबत न्यायालयात क' समरी अहवाल दाखल झालेला आहे अशा एकूण ३४ संस्थाना न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून काळया यादीतून वगळण्याची तर उर्वरीत ७१ संस्थाचे नाव काळ्या यादीत कायम ठेवण्याची शिफारस शासनास केली आहे. तसेच काही संस्थानी रिट याचिकेद्वारे काळ्या यादीत टाकलेल्या निर्णयास न्यायालयात आव्हान दिलेले आहे.

सबब आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी शासनाने काळ्या यादीत टाकलेल्या एकूण १०५ संस्थापैकी ३४ संस्थाना काळ्या यादीतून वगळण्याची केलेली शिफारस शासनस्तरावर स्विकारुन सदर ३४ संस्थांना काळ्या यादीतून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**४. शासन निर्णय :-**

खालील कोष्टकामध्ये नमूद करण्यात आलेल्या खाजगी पुरवठादार / संस्थांना यापुढे आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांकरीता शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग आयआयआय/उद्योग- ४. दिनांक ०१.१२.२०१६ च्या ५.४.२ नुसार बंदी घालण्यात आलेल्या **काळ्या यादीतून न्यायालयीन निर्णयाच्या अधीन राहून वगळण्यात** येत आहे.

**खाजगी पुरवठादार/संस्थाची यादी**

| अ.क्र | काळ्या यादी तील क्रमांक | संस्थेचे नाव |
|---|---|---|
| १ | १ | शिवाजी महाराज आदिवासी बहुद्देशीय शिक्षण क्रिडा व व्यायाम प्रसारण मंडळ |
| २ | २ | निळकंठेश्वर बहुद्देशीय सेवाभावी संस्था, परभणी |
| ३ | ४ | महात्मा फुले ग्रामीण व आदिवासी संस्था, आलेगाव |
| ४ | ५ | नागेश्वर चॅरीटेबल ट्रस्ट, नागपूर |
| ५ | ६ | युनिक अॅकडमी, अमरावती |
| ६ | ७ | श्री.व्यंकटेश सेवा समिती, वत्सगुलम,वाशिम |
| ७ | ९ | आदिवासी मच्छिमार कृषि सेवा संस्था |
| ८ | १० | आकार बहु.ग्रा.विकास संस्था, चंद्रपूर |
| ९ | १५ | अपेक्स कॉमप्युटर, गोंडपिंपरी |
| १० | २० | अथर्व कॉम्प्युटर्स, गडचांदूर |
| ११ | २१ | अथर्व कॉम्प्युटर्स, गडचांदूर रोड,राजूरा |

| | | |
|---|---|---|
| १२ | २३ | बाईट्स इन्फोसिस कॉम्प्युटर्स, चंद्रपूर |
| १३ | २५ | करिअर ड्रिम कॉम्प्युटर एज्युकेशन सिंदेवाही, चंद्रपूर |
| १४ | २६ | सेंट्रल अॅग्रीकल्चर एजन्सी सिताबर्डी,नागपूर |
| १५ | २९ | क्रिऐटीव्ह कॉम्प्युटर्स, तलासरी, डहाणु. |
| १६ | ३५ | हरीओम कॉम्प्युटर्स, एजुकेशन सेंटर, चंद्रपूर. |
| १७ | ४७ | जिज्ञासा ट्रस्ट, शहापूर ठाणे. |
| १८ | ५० | लिफ्ट वेलफेअर ट्रस्ट, नाशिक. |
| १९ | ५७ | एमडी, डिएसएच कंस्ट्रक्शन कंपनी. श्री.राजेश बावीस्कर, राजुर, नाशिक. |
| २० | ६८ | प्रगती कॉम्प्युटर, जव्हार. |
| २१ | ७४ | राज मधुर कॉम्प्युटर्स, पेण. |
| २२ | ७६ | राणु गुरुजी शिक्षण आणि सामाजिक संस्था, जव्हार. |
| २३ | ७८ | साहिल कॉम्प्युटर्स ट्रेनिंग इन्स्टीट्युट, ठाणे. |
| २४ | ८१ | सायन्स अकॅडमी, नाशिक. |
| २५ | ८३ | श्रमिक जनता विकास संस्था, मेढा, ता. जावळी, जि. सातारा. |
| २६ | ८६ | श्रीराम इन्स्टीट्युट, विक्रमगड, जव्हार. |
| २७ | ८७ | शुर झलकारी कातकरी एकता महासंघ, ठाणे. |
| २८ | ८९ | स्काय कॉम्प्युटर किन्हवली, शहापूर. |
| २९ | ९० | सोहम कॉम्प्युटर्स, शहापूर. |
| ३० | ९१ | सोना कमर्शियल इन्स्टीट्युट, शहापूर. |
| ३१ | ९२ | सक्सेस कॉम्प्युटर्स, मुलखेडा, चंद्रपूर. |
| ३२ | १०० | व्हिजन इनफोटेक, कर्जत, पेण. |
| ३३ | १०४ | विनझिप कॉम्प्युटर एजुकेशन, भिवंडी, जि.ठाणे. |
| ३४ | १०५ | यशश्री एन्टरप्रायझेस, बोरिवली (पुर्व), मुंबई. |

**५.** आदिवासी विकास विभागातंर्गतच्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांनी या आदेशाची तात्काळ अमंलबजावणी करावी.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०५२६१६०७१९०७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY JAGANNATH PATIL

Digitally signed by SANJAY JAGANNATH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Tribal Development Department, 2.5.4.20=0AEF67F1B466CDA14A91421532B9A0945726BFE27ADE33F9F8E47372FBA0CAB4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0F0C94D65F6AB75FC142521D11102FA6EC890FBFC764A09F7584B7DC5741A83B, cn=SANJAY JAGANNATH PATIL
Date: 2025.05.26 16:07:53 +05'30'

**(सं.ज.पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,

४) मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,

५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,

९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,

१०) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,

११) सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास,

१२) निवड नस्ती का.७.